**केंद्र शासनाचे मॉडेल प्रिझन मॅन्युअल, २०१६ व महाराष्ट्र प्रिझन मॅन्युअल, १९७९ मधील तरतुदींचा तौलानिक अभ्यास करुन अभ्यासगटाने सादर केलेल्या अहवालाच्या अनुषंगाने तसेच नॅशनल जेल मॅन्युअलशी सुसंगत एकाच परिसरात (कॉम्प्लेक्समध्ये) कारागृह, दवाखाना व कोर्ट तयार करण्यासाठी शासनास शिफारशी करण्याकरीता सचिव समिती पुनर्गठीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. जेएलएम-१०१५/प्र.क्र.६६/तुरुंग-२**
दुसरा मजला, मुख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ डिसेंबर, २०२१.

संदर्भ :- १) शासन निर्णय क्र.जेएलएम-१०१५/प्र.क्र.६६/तुरुंग-२, दिनांक ०२/१२/२०१६
२) शासन निर्णय क्र.जेएलएम-०१२१/प्र.क्र.७/तुरुंग-२, दिनांक ०८/०१/२०२१

प्रस्तावना:-

राज्यातील बऱ्याच कारागृहांमध्ये कैद्यांची संख्या अधिकृत क्षमतेपेक्षा जास्त असल्याने त्यांना कारागृहात ठेवण्याकरीता जागा कमी पडते. राज्यातील बहुतांश कारागृहांचे बांधकाम हे इंग्रजांच्या काळातील असल्याने, जेल मॅन्युअलप्रमाणे कार्यवाही करण्यात खूप मर्यादा येतात. तसेच, जेलमधून कैद्यांना कोर्टपेशीसाठी घेऊन जाणे हे फार जिकीरीचे होते. मा.उच्च न्यायालयाने वेळोवेळी सूचित केल्यानुसार तुरुंग हे पोलीस स्टेशन, दवाखाना व न्यायालय यांच्याजवळच्या अंतरावर असावेत या दृष्टीने कशाप्रकारे कार्यवाही करता येईल, तसेच तशी कार्यवाही करणे नॅशनल जेल मॅन्युअलमधील तरतुदींशी सुसंगत कशी ठरू शकेल, याबाबत अभ्यास करुन त्यानुषंगाने शासनास शिफारशी करण्याकरीता संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये एक सचिव समिती गठीत करण्यात आली होती.

२. दरम्यान, केंद्र शासनाने "मॉडेल प्रिझन मॅन्युअल, २०१६" तयार केले असून त्यामधील तरतुदी राज्याच्या प्रिझन मॅन्युअलमध्ये अंतर्भूत करणेबाबत सर्व राज्यांना सूचना दिल्या आहेत. महाराष्ट्र राज्याच्या प्रिझन मॅन्युअलसह सखोल तौलनिक अभ्यास करुन सविस्तर अहवाल शासनास सादर करण्यासाठी, संदर्भ क्र. २ अन्वये अभ्यासगट स्थापन करण्यात आला असून, सदर अभ्यासगटाने स्वीकारार्ह तरतुदींसंदर्भातील सविस्तर अहवाल शासनास सादर केला आहे.

तथापि, उक्त परिच्छेद क्र.१ येथील मुद्दयाच्या अनुषंगाने अभ्यास करुन आणि परिच्छेद क्र.२ येथील मॉडेल प्रिझन मॅन्युअल, २०१६ च्या अनुषंगाने अभ्यासगटाने तयार केलेल्या अहवालाचा अभ्यास/ छाननी करुन त्यानुषंगाने शासनास शिफारशी करण्याकरीता वाचा २ येथील समिती पुनर्गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील दिनांक ०२/१२/२०१६ रोजीचा शासन निर्णय याद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहे.

२. मा.उच्च न्यायालयाने वेळोवेळी सूचित केल्यानुसार कारागृह, दवाखाना व न्यायालयाकरीता तसेच केंद्र शासनाच्या मॉडेल प्रिझन मॅन्युअल, २०१६ मधील तरतुदींच्या अनुषंगाने महाराष्ट्र प्रिझन मॅन्युअल, १९७९ मधील तरतुदींचा अभ्यास करुन स्विकारार्ह तरतुदींची शासनास शिफारस करण्याकरीता खालीलप्रमाणे सचिव समिती पुनर्गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. अपर मुख्य सचिव (अपिल व सुरक्षा), गृह विभाग, मंत्रालय | - | अध्यक्ष |
| २. अपर मुख्य सचिव , सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ३. प्रधान सचिव (विधी परामर्शी), विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ४. सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय | - | सदस्य |
| ५. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे | - | सदस्य |
| ६. अति.अधिक्षक, कारागृह मुख्यालय, अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे | - | सदस्य |
| ७. उपसचिव (तुरुंग), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई. | - | सदस्य सचिव |

३. कारागृहांचे कामकाज सोयीस्कर व गतिमान कसे करता येईल, याबाबत अभ्यास करुन तसेच मॉडेल प्रिझन मॅन्युअल, २०१६ व महाराष्ट्र प्रिझन मॅन्युअल, १९७९ यांची सांगड घालून स्विकारार्ह तरतुदींसंदर्भात अभ्यासगटाने सादर केलेल्या अहवालाचा अभ्यास/ छाननी करुन सदर समिती तिचा अहवाल समितीच्या स्थापनेपासून तीन महिन्यांच्या आत शासनास सादर करील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११२१५१६४००५९५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

ANIRUDDHA V
JEWLIKAR

Digitally signed by ANIRUDDHA V JEWLIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=29c6c42b5811a121a201ecd7aceaac3251c7d1ded31ff1b6e1a88d86b600c6b
d, pseudonym=A29ED764E36FC94AB894683327375533A01AD102,
serialNumber=B986D51C7C29938C2BBB53D563F07DFC61C84B730CB9118407ECAB6
A27C67C4C, cn=ANIRUDDHA V JEWLIKAR
Date: 2021.12.16 11:33:37 +05'30'

**( अनिरुध्द व्यं. जेवळीकर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (अपिल व सुरक्षा) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
२. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२,
३. प्रधान सचिव (विधी परामर्शी) यांचे स्वीय सहायक, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
४. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
५. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. अति.अधिक्षक, कारागृह मुख्यालय, अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. उपसचिव (तुरुंग) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
८. निवडनस्ती, तुरुंग-२ कार्यासन, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.